विठाबाई नारायणगांवकर पुरस्कारासाठी पुरस्कार्थींची निवड करण्यासाठी निवड समितीची पुनर्रचना करण्याबाबत.

**महाराष्ट्रशासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. विनापु १७१८/प्र.क्र.३४९/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २९ नोव्हेंबर, २०१८

संदर्भ: १) शासन निर्णय क्र. लोलस्प २००४/ प्र.क्र.२७८/सां.का.३, दि. २४.०३.२००५
२) शासन निर्णय क्र. विनापु १७१५ (१३)/ प्र.क्र.१०९/सां.का.४, दि. ०९.११.२०१५

**प्रस्तावना :-**

तमाशा क्षेत्रात श्रीमती विठाबाई नारायणगावकर यांनी केलेली प्रदीर्घ सेवा विचारात घेता त्यांच्या नांवे तमाशा क्षेत्रात प्रदीर्घ सेवा केलेल्या ज्येष्ठ कलाकारास जीवन गौरव पुरस्कार देऊन सन्मानित करण्याची योजना महाराष्ट्र शासनातर्फे सन २००५ पासून राबविण्यात येते. या पुरस्काराकरिता पुरस्कार्थीची निवड करण्याकरिता, दिनांक ०९ नोव्हेंबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये गठीत करण्यात आलेल्या समितीचा कार्यकाल संपुष्टात आल्यामुळे, नवीन निवड समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

तमाशासम्राज्ञी विठाबाई नारायणगांवकर जीवनगौरव पुरस्कार निवड समितीची खालील प्रमाणे पुनर्रचना करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

**अ) शासकीय सदस्य**

| | | |
|---|---|---|
| १. | मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य | अध्यक्ष |
| २. | प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य विभाग | सदस्य |
| ३. | संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय | सदस्य सचिव |

**ब) अशासकीय सदस्य**

| | | |
|---|---|---|
| १. | श्री. दत्तोबा फुलसुंदर, नारायणगाव | अशासकीय सदस्य |
| २. | श्रीमती लता पुणेकर, पुणे | अशासकीयसदस्य |
| ३. | श्रीमती जयमाला इनामदार, पुणे | अशासकीयसदस्य |
| ४. | श्री. प्रकाश खांडगे, मुंबई | अशासकीयसदस्य |
| ५. | श्री. भिमराव तातोराम गोपाळ, धुळे | अशासकीयसदस्य |
| ६. | श्री. विद्याधर जिंतीकर, पुणे | अशासकीयसदस्य |
| ७. | श्रीमती श्यामल गरुड, मुंबई | अशासकीयसदस्य |

या समितीचा कार्यकाल या शासन निर्णयाच्या दिनांकापासून ३ वर्षांच्या कालावधीसाठी किंवा समितीची पुनर्रचना होईपर्यंत एवढया कालावधीसाठी राहील.

**<u>प्रवास व बैठक भत्ता</u> :-**

समितीच्या अशासकीय सदस्यांना वित्त विभागाच्या प्रचलित शासन निर्णयानुसार प्रवास भत्ता व बैठक भत्ता अनुज्ञेय राहील.

यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी व लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांनाआहरण व संवितरण म्हणून घोषित करण्यात येत आहे. यासाठीचा खर्च हा मागणी क्र. झेडडी-२, मुख्यलेखाशिर्ष २२०५, १०२- कला व संस्कृती यांचे प्रचालन, ०५ कलाक्षेत्रात उल्लेखनीय पारितोषिके, (०५) (०१) अभिनित कलाक्षेत्रात उल्लेखनीय कार्याबद्दल पारितोषिके, ०५ पुरस्कार (२२०५ १४३६) या योजनेतंर्गत उपलब्ध तरतूदीतून भागविता यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८११२९१७४११६५४२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Shailesh
Tukaram Jadhav

Digitally signed by Shailesh Tukaram Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tourism And Cultural Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=2f28af075ed91b64d12528e9ab00bb144f43fcf33c23ccf14c820b969f8ca273, serialNumber=a90555ec4a073187eb44ee0b1aa93e5c855afff34eedb4b03bb3e0a6cfd6271c, cn=Shailesh Tukaram Jadhav
Date: 2018.11.30 17:25:19 +05'30'

**( शैलेश तु. जाधव )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव
२. प्रधान सचिव, सांस्कृतिक कार्य यांचे स्वीय सहाय्यक
३. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
४. निवड समितीचे सर्व अशासकीय सदस्य (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांच्यामार्फत)
५. महालेखापाल (महाराष्ट्र १) (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) मुंबई
६. महालेखापाल (महाराष्ट्र २) (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) नागपूर
७. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
८. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
९. अवर सचिव (अर्थसंकल्प शाखा), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१०.निवड नस्ती, सां.का.४.